नागपूर येथे विधी मंडळाच्या
हिवाळी अधिवेशनाच्या कामासाठी
जाणा-या कर्मचा-यांना दैनिक भत्ता
देण्याबाबत. ...

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : प्रवास-१०९८/प्र.क्र. २/सेवा-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ४ फेब्रुवारी, १९९८

पहा : १] शासन निर्णय, वित्त विभाग क्र. प्रवास-१०९२/सीआर-५९/सेवा-५, दिनांक १ एप्रिल, १९९२.

२] शासन निर्णय, वित्त विभाग क्र. प्रवास-१०९७/प्र.क्र. १/सेवा-५, दिनांक १.१.१९९७.

## परिपत्रक

वित्त विभागाच्या उपरोक्त दिनांक १ जानेवारी, १९९७ च्या आदेशान्वये नागपूर येथे भरलेल्या विधी मंडळाच्या हिवाळी अधिवेशनासाठी विभागीय शिबिर कार्यालये उघडण्यात येणा-या दिनांकापासून ते कार्यालय बंद होईपर्यंतच्या कालावधीत, अधिवेशनाच्या कामानिमित्त नागपूर येथे गेलेल्या सर्व अधिकारी/कर्मचारी यांना पुढील वर्षी वाढ देण्यात येणार नाही या अटीच्या अधीन राहून दैनिक भत्त्याच्या दरात सुधारणा करण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

२. उपरोक्त शासन निर्णय दिनांक १.१.१९९७ च्या आदेशान्वये नमूद करण्यात आलेले दैनिक भत्त्याचे वाढीव दर ९ डिसेंबर, १९९६ पासून नागपूर येथे भरलेल्या विधी मंडळाच्या हिवाळी अधिवेशन कालावधीपुरतेच मर्यादित आहे किंवा कसे, ही विचारणा होत असल्याने आता असा खुलासा करण्यात येत आहे की, सदरहू वाढीव दैनिक भत्त्याचे दर वर नमूद केलेल्या डिसेंबर, १९९६ मधील अधिवेशन कालावधीपुरतेच मर्यादित नसून विधी मंडळाच्या नागपूर येथील त्या पुढील अधिवेशनाच्या कालावधीसाठी देखील वरील वाढीव दर कायम राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ श. वि. [illegible] ]
उप सचिव, वित्त विभाग.

कृ.मा.प. ...

प्रत,

१. महालेखापाल-१ [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र, मुंबई.

२. महालेखापाल-२ [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र, नागपूर.

३. महालेखापाल-१ [लेखा परीक्षा] महाराष्ट्र, मुंबई.

४. महालेखापाल-२ [लेखा परीक्षा] महाराष्ट्र, नागपूर.

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

७. राज्यपालांचे सचिव.

८. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.

९. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव.

१०. सर्व मंत्र्यांचे व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक.

११. सर्व मंत्रालयीन विभाग.

१२. सर्व विभागीय आयुक्त.

१३. सर्व जिल्हाधिकारी.

१४. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

१५. वित्त विभागातील सर्व कार्यासने.

१६. सर्व कोषागार अधिकारी.

१७. निवड नस्ती, सेवा-५.